राज्यातील सहकारी उपसा जलसिंचन संस्थांना सन २०२३-२४ मध्ये २५% अनुदान मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक: सीएसएल-१५२३/प्र.क्र.१८३/७-स,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २८ मार्च, २०२४.

**वाचा :** १. शासन निर्णय क्रमांक: सीएसएल-१४९४/२८२२/प्र.क्र.१३३/७-स, दि.१९.११.१९९४.
२. शासन निर्णय क्रमांक: सीएसएल-१५१३/प्र.क्र.९२३/७-स, दि.२४.१२.२०१३ व
३. समक्रमांकाचे शुध्दीपत्रक दिनांक २८.०२.२०१४.
४. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. ०४ मार्च,२०२४

**प्रस्तावना-:**

राज्यातील सहकारी उपसा जलसिंचन योजनांच्या प्रकल्प खर्चामध्ये गेल्या काही वर्षात सातत्याने वाढ होत असून, त्यामुळे अल्प व सिमांत शेतकरी सभासदच नव्हे तर मध्यम व मोठया शेतकऱ्यांना सुध्दा वाढता प्रकल्प खर्च करणे आर्थिकदृष्या अडचणीचे झाले आहे. शासनाच्या खर्चाने ज्या लहान मोठया पाटबंधारे योजना हाती घेण्यात येतात त्या योजनांच्या लाभक्षेत्रातील शेतकऱ्यांना कोणत्याही खर्चाविना पाण्याची सोय उपलब्ध होते. या उलट इतर भागातील शेतकऱ्यांनी स्वत:च उपसा जलसिंचनाची व्यवस्था करण्याचे ठरविल्यास त्यांच्या योजनांचा संपूर्ण खर्च त्यांना स्वत:च करावा लागतो. त्यामुळे सहकारी उपसा जलसिंचन योजनांच्या लाभधारक सभासदांवरील खर्चाचा बोजा कमी करुन तो काही प्रमाणात शासनाकडून उचलला जावा, या दृष्टीकोनातून उपरोक्त शासन निर्णय, दिनांक १९.११.१९९४ अन्वये सदर शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट “अ” मधील अटींच्या अधिन राहून वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या नियतव्ययामधून सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात सहकारी उपसा जलसिंचन योजनांना अर्थसहाय्य देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून सदर शासन निर्णयानुसार अनुदान मंजूरीसाठी प्राप्त झालेल्या प्रस्तावांपैकी सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी १७ सहकारी उपसा जलसिंचन संस्थांना रु.३,०५,७६,०००/- (रुपये तीन कोटी पाच लाख शहात्तर रुपये फक्त) इतके अनुदान मंजूर करुन वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सोबतच्या परिशिष्ट -अ॰ मधील १७ सहकारी उपसा जलसिंचन संस्थांना देण्यात आलेली मंजूरी, प्रस्तावासोबत सहकार आयुक्त, पुणे यांच्याकडून सादर करण्यात आलेल्या माहितीच्या आधारे देण्यात आलेली असल्याने सादर केलेल्या कागदपत्रात तसेच माहितीत काही विसंगती आढळून आल्यास सदरहु रक्कम संबंधीत संस्थांकडून व्याजासह एकरकमी वसूल केली जाईल या अटींच्या अधिन राहील.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याचा रकमेचा धनादेश, ज्या बँक/वित्तीय संस्थांकडून सहकारी उपसा जलसिंचन संस्थेने प्रकल्प खर्चाकरीता कर्ज घेतलेले असेल, त्या बँकेच्या/वित्तीय संस्थेच्या व्यवस्थापक/प्रबंधक यांचे नावे काढण्यात यावा. तसेच सदर धनादेश प्राप्त झाल्यानंतर बँकेने/वित्तीय संस्थेने त्यांना धनादेशाद्वारे प्राप्त झालेली अर्थसहाय्याची रक्कम संबंधीत सहकारी उपसा जलसिंचन संस्थेकडून त्यांना येणे असलेल्या कर्जाच्या रकमेपोटी समायोजित करावी.

४. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात या योजनेकरीता उपलब्ध तरतुदीमधून रु. ३,०५,७६,०००/- (रुपये तीन कोटी पाच लाख शहात्तर फक्त) इतकी रक्कम परिशिष्ट -अ॰ प्रमाणे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालय स्तरावर बी.डी.एस. वर उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. या योजनेवरील रक्कम खर्ची घालण्याकरीता सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

**५. निधी वितरीत केल्यानंतर किंवा त्यापूर्वी प्रत्यक्ष उपसा योजनेची पहाणी करुन निधीचा योग्य वापर झाल्याची खात्री करावी. तसेच लाभार्थी शेतकऱ्यांची पण प्रत्यक्ष भेट घ्यावी. त्यामध्ये काही चुकीचे होऊ नये याची दक्षता घ्यावी.**

**६. वरीलप्रमाणे कार्यवाही न झाल्यास संस्थेबरोबर तपासणी अधिकाऱ्यावर देखील जबाबदारी निश्चित करण्यात यावी.**

७. शासनाच्या वतीने सदर रक्कम कोषागारातून काढून संबंधीत बँक/वित्तीय संस्थेस धनादेशाद्वारे अदा करण्यास सहाय्यक निबंधक (अर्थ व नियोजन) (V०००४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत असून त्यांना आहरणाचे व संवितरणाचे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. त्यांनी सदरचा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील रु. ३,०५,७६,०००/- (रुपये तीन कोटी पाच लाख शहात्तर फक्त) तरतुदीतून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागवावा. लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वरीलप्रमाणे काढलेली रक्कम संबंधीत बँकेस/वित्तीय संस्थेस त्यांच्या कर्जाच्या रकमेपोटी अदा केल्यानंतर त्याबाबतचा पूर्तता अहवाल १५ दिवसांत शासनास सादर करावा.

**८. शासन निर्णय क्रमांक सीएसएल-१४९४/२८२२/प्र.क्र.१३३/७-स, दिनांक १९.११.१९९४ व २४.१२.२०१३ आणि २८.०२.२०१४ सोबतच्या परिशिष्ट “अ” मधील अटींची तंतोतंत पुर्तता झाल्यानंतरच सहकार आयुक्त यांनी संबंधीत संस्थाना अनुदानाचे वाटप करावे.**

९. या करीता होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक व्ही -२,
२४२५, सहकार
१०८, इतर सहकारी संस्थांना सहाय्य

(पाच) इतर संकिर्ण सहकारी संस्था
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (राज्य योजनांतर्गत योजना)
(०५) (०२) उपसा जलसिंचन योजनांना अर्थसहाय्य (कार्यक्रम) (२४२५ १२६१)
३३, अर्थसहाय्य,

**१०.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२८१७२७०१८६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VANDANA PUNAMCHAND JAIN

Digitally signed by VANDANA PUNAMCHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=c0be3d02a7ef993d0d681f82a13d767edd8ce5e8baaded590e47d15c25db0d41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=49C088CE996033C80D13976ED6101E75EE2961D43B217F45AE6B247E6D77D12A, cn=VANDANA PUNAMCHAND JAIN
Date: 2024.03.28 17:37:05 +05'30'

**( वंदना जैन )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई
२. महालेखापाल, लेखा अनुज्ञेयता, महाराष्ट्र -२, नागपूर
३. महालेखापाल, लेखा परिक्षण, महाराष्ट्र -१, मुंबई,
४. महालेखापाल, लेखा परिक्षण, महाराष्ट्र -२, नागपूर,
५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, अहमदनगर/सांगली/कोल्हापूर,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर/सांगली/कोल्हापूर,
८. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२) मंत्रालय, मुंबई
९. कार्यासन अधिकारी, का. १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. कार्यासन अधिकारी (१६-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
११. कार्यासन अधिकारी (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
१२ .निवड नस्ती.

**परिशिष्ट "अ"**

**शासन निर्णय क्र. सीएसएल-१५२३/प्र.क्र.१८३/७-स, दि.२८ मार्च,२०२४ सोबतचे सहपत्र सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात अनुदान मंजुरीसाठी पात्र ठरलेल्या सहकारी उपसा जलसिंचन संस्थांची यादी.**

| अ.क्र. | संस्थेचे नाव | अनुदानाची रक्कम (रुपये) |
|---|---|---|
| १ | श्री.दत्त सहकारी पाणीपुरवठा संस्था, बुधगाव, ता.मिरज, जि.सांगली. (सभासद संख्या-१०३) | रु. १,९६,३०२/- (अनुज्ञेय निधी रु. २१,५८,२५०/- मात्र निधी उपलब्धे अभावी रु. १९,६१,९४८/- इतके अनुदान दि.३१.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये अदा करण्यात आले आहे. उर्वरित रक्कम रु. १,९६,३०२/- अदा करण्यात येत आहे.) |
| २ | श्री दत्त ठिबक जलसिंचन सहकारी संस्था, रुईखेल, ता. श्रीगोंदा, जि. अहमदनगर. (सभासद संख्या-१०) | १०,७०,९००/- |
| ३ | कै खासदार बाळासो माने शं. माने उपसा जलसिंचन सहकारी संस्था, माले ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर.(सभासद संख्या-६४) | १५,७५,७१०/- |
| ४ | श्री एकविरा देवी सहकारी पाणीपुरवठा संस्था देवाळे, ता. करवीर, जि. कोल्हापूर (सभासद संख्या-५३२) | ३७,३४,४४८/- |
| ५ | श्री नागेश्वर सहकारी पाणीपुरवठा संस्था मर्या., म्हालसवडे, ता. करवीर, जि. कोल्हापूर (सभासद संख्या ६०) | १८,४९,५३०/- |
| ६ | श्री.जय गणेश सहकारी पाणीपुरवठा संस्था मर्या आष्टा ता. वाळवा जि. सांगली (सभासद संख्या-८) | १४,०९,५००/- |
| ७ | श्री पांडुरंग सहकारी पाणीपुरवठा संस्था, मौजे मोडसिंगी, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर (सभासद संख्या ११२) | १६,८५,०२७/- |
| ६ | अरविंद पाटील सहकारी पाणी पुरवठा संस्था मर्या., वसगडे, ता. पलूस, जि. सांगली. (सभासद संख्या २७) | २५,५६,७७१/- |
| ७ | श्री स्वामी समर्थ ठिबक जलसिंचन पाणीपुरवठा सहकारी संस्था मर्या., मांडवगण, ता. श्रीगोंदा जि. अहमदनगर (सभासद संख्या ७) | ११,५२,०८७ |
| ८ | भावेश्वरी सहकारी पाणीपुरवठा संस्था, गोरंबे ता. कागल, जि. कोल्हापूर (सभासद संख्या २१) | १३,८९,२५०/- |

| | | |
|---|---|---|
| ९ | शिवशांती सहकारी पाणीपुरवठा संस्था मर्या., आष्टा . ता. वाळवा जि. सांगली (सभासद संख्या २४) | १३,२१,०००/- |
| १० | श्री चौंडेश्वरी सहकारी पाणी पुरवठा संस्था मर्या., आष्टा ता. वाळवा जि. सांगली (सभासद संख्या २३) | २७,५०,०००,/- |
| ११ | भैरवनाथ सहकारी पाणीपुरवठा संस्था मर्या., फाळकेवाडी (चंदवाडी) ता. वाळवा, जि. सांगली (सभासद संख्या १२) | १६,००,०००/- |
| १२ | आनंद सहकारी पाणीपुरवठा संस्था मर्या., आष्टा ता. वाळवा जि. सांगली (सभासद संख्या १२) | १६,०९,०००/- |
| १३ | भैरवनाथ आनंद सहकारी पाणीपुरवठा संस्था मर्या., अबंपवाडी, ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर (सभासद संख्या १२) | ७,२७,९५३/- |
| १४ | श्री महालक्ष्मी सहकारी पाणीपुरवठा संस्था मर्या., कसबा सांगाव ता. कागल, जि. कोल्हापूर (सभासद संख्या ६३) | १५,६१,६७५/- |
| १५ | जोर्तिलिंग सहकारी पाणी पुरवठा संस्था, बिऊर ता. शिराळा , जि. सांगली (सभासद संख्या ४४) | ८,९३,२५०/- |
| १६ | श्री हनुमान सहकारी पाणी पुरवठा संस्था मर्या., वसगडे ता. पलूस जि. सांगली (सभासद संख्या २५) | २१,९२,६०६/- |
| १७ | भैरवनाथ सहकारी पाणी पुरवठा संस्था मर्या., गाताडवाडी, ता. वाळवा जि. सांगली (सभासद संख्या १५४) | रु. १३,००,९९१/- (अनुज्ञेय निधी रु. ६३,११,८८७/- मात्र निधी उपलब्धे अभावी रु. १३,००,९९१/- इतके अनुदान वितरीत करण्यात येत आहे.) |
| **एकुण रु.३,०५,७६,०००/- (रुपये तीन कोटी पाच लाख शहात्तर हजार फक्त)** | | |

VANDANA PUNAMCHAND JAIN

Digitally signed by VANDANA PUNAMCHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=c0be3d02a7ef993d0d681f82a13d767edd8ce5e8baaded590e47d15c25db0d41,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=49C088CE996033C80D13976ED6101E75EE2961D43B217F45AE6B247E6D77D12A,
cn=VANDANA PUNAMCHAND JAIN
Date: 2024.03.28 17:37:27 +05'30'

**( वंदना जैन )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**